**एकात्मिक गृहनिर्माण व झोपडपट्टी विकास कार्यक्रम (आय.एच.एस.डी.पी.) अंतर्गत केंद्र व राज्य हिश्श्याची तरतूद वितरीत करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## गृहनिर्माण विभाग

**शासन निर्णय क्रमांकः क्र.जनेयो.१२.१०/२०१४/प्र.क्र.४२/भाग-१/गृनिधो-२ (सेल),**

४ था मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल,
नवीन मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
दिनांक-०८जानेवारी २०१५.

वाचा

१) व्यय विभाग, वित्त मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.F.NO.५९(४)/PF-I/२०१३-१२०७,Date.१९.१२.२०१३.
२) केंद्रीय गृहनिर्माण व शहरी गरीबी निर्मुलन मंत्रालयाचे पत्र क्र.F.NO.G-२००११ / २/ २०१४/ BSUP/JNNURM/(FTS-१०४०८)/Date.२०.५.२०१४.
३) केंद्रीय गृहनिर्माण व शहरी गरीबी निर्मुलन मंत्रालयाचे पत्र क्र.PAO.SECTY/ UD/ ADMN/ GRANT-IN-AID/ADVICES/२०१४-१५/Date-१६.६.२०१४.

## शासन निर्णय

केंद्र शासनाच्या गृहनिर्माण व शहरी गरीबी निर्मुलन मंत्रालयाने शहरी भागातील झोपडपट्टीवासियांचे जीवनमान उंचावण्यासाठी घोषित झोपडपट्टयांमध्ये राहणाऱ्या तसेच झोपडपट्टयातील आरोग्यास अपायकारक अशा परिस्थितीत राहणाऱ्या झोपडपट्टीवासियांसाठी जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी पुनरुत्थान कार्यक्रम (JNNURM) हा कार्यक्रम सुरु केलेला आहे. या कार्यक्रमामध्ये एकात्मिक गृहनिर्माण व झोपडपट्टी विकास कार्यक्रम (आय.एच.एस.डी.पी.) या उपकार्यक्रमाचा समावेश करण्यात आला आहे. एकात्मिक गृहनिर्माण व झोपडपट्टी विकास कार्यक्रम (आय.एच.एस.डी.पी.) हा कार्यक्रम शहरी गरीबांना मुलभूत सुविधा पुरविणे (बी.एस.यु.पी.) या कार्यक्रमामध्ये समाविष्ट असलेली शहर वगळून राज्यातील उर्वरीत शहरांकरीता सुरु करण्यात आला आहे. झोपडपट्टीचा एकसंघ विकास करणे व पर्यायी निवारा व मुलभूत सोयी सुविधा झोपडपट्टीतील रहिवाशांना उपलब्ध करुन देणे हे या कार्यक्रमाचे मुलभूत उद्दिष्ट आहे.

२. या योजनेची अंमलबजावणी करताना शासनाने महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणाची राज्यस्तरीय सुकाणू अभिकरण (नोडल एजन्सी) म्हणून नेमणूक केली आहे.

३. एकात्मिक गृहनिर्माण व झोपडपट्टी विकास कार्यक्रम (आय.एच.एस.डी.पी) या योजनेकरिता सन २०१४-१५ च्या अर्थसंकल्पात केंद्र हिस्सा २२१६१४६१ या लेखाशिर्षांतर्गत, रु.३०० कोटी, तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आलेली आहे. प्रमाणित करण्यात येते की सदर शासन

निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेल्या रक्कमेसहीत सदर लेखाशिर्षांखाली उपलब्ध तरतूदीमधून खर्चासाठी उपलब्ध असलेल्या निधी (६०%) मर्यादेच्या आत आहे.

४. केंद्र शासनाच्या संदर्भ क्र.१ ते३ अन्वये खालील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे सन २०१३-१४ व सन २०१४-१५ मध्ये प्रकल्पावार एकूण रु.१४३.१४ लाख राज्यास वितरीत झालेले आहेत.

(रुपये लाखात)

| क्र. | प्रकल्पाचे नांव | प्रकल्प किंमत | केंद्र शासनाव्दारे वितरीत २२१६१४६१ | हप्ता क्रमांक |
|---|---|---|---|---|
| १ | बाळापूर | ४०३८.१० | ३६.७१ | तपशिलवार प्रकल्प अहवाल (DPR) तयार करण्यासंबंधीच्या खर्चाची प्रतिपूर्ती एकवेळचे प्रदान |
| २ | दोंडाईचा फेज-१ | १६७६.७१४ | १५.९७ | |
| ३ | खामगाव फेज-१ | २७३७.७७ | २३.६४ | |
| | एकूण-१-३ | | ७६.३२ | |
| ४ | कागल | २१९०.८५ | ५.०० | |
| ५ | येवला | १३६.६९ | १.३६ | |
| ६ | पवनी | १४६.४० | १.४६ | |
| ७ | कारंजा | १८५६.९५ | १६.५३ | |
| ८ | शिरपूर -वरवडे | ४८५.९७ | ४.८६ | |
| ९ | लोणार-१ | १६२२.०८ | १६.२२ | |
| | एकूण-४-९ | | ४५.४३ | |
| १० | लोणार-२ | २१३९.११ | २१.३९ | |
| एकूण (१ ते१०) | | | १४३.१४ | |

५. केंद्र हिश्श्यापोटी राज्यास प्राप्त परंतू, अवितरीत असलेला रु.१,४३,१४,०००/-(रु.एक कोटी त्रेचाळीस लाख चौदा हजार फक्त) इतका निधी या शासन निर्णयाव्दारे सोबतच्या विवरणपत्रात दर्शविलेल्या नागरी स्वराज्य संस्थांस त्यांच्या नावांसमोर दर्शविल्यानुसार वितरीत करण्यासाठी राज्यस्तरीय सुकाणू अभिकरणास या शासन निर्णयाव्दारे उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

६. राज्य शासनामार्फत उपलब्ध करुन देण्यात येणारी सदर रक्कम तात्काळ महाराष्ट्र निवारा निधीतच जमा करण्यात यावी व नागरी स्वराज्य संस्थांना वितरीत होईपर्यंत सदर रक्कम महाराष्ट्र निवारा निधीतच ठेवण्यात यावी.

७. प्राधिकरणाने सदरची रक्कम खर्च करण्यासाठी अवर सचिव, गृहनिर्माण विभाग (आहरण व संवितरण अधिकारी) यांनी प्रतिस्वाक्षरीत केलेले विहित प्रपत्रातील सदर रकमेचे देयक अधिदान व लेखा कार्यालयास याच महिन्यात सादर करण्याची दक्षता घ्यावी.

८. ज्या प्रयोजनासाठी केंद्र शासनाने निधी उपलब्ध करुन दिला आहे, त्याच प्रयोजनासाठी त्याचा विनियोग करणे आवश्यक आहे व सदर तरतूद केंद्र शासनाच्या निकषानुसार खर्च होईल याची दक्षता घ्यावी. सदर रकमेचे वितरण MP-SIMS या शासनाच्या संगणक प्रणालीवर भरण्याची जबाबदारीही प्राधिकरणाची राहील. अनुसुचित जाती उपयोजनेंतर्गत मंजूर रक्कम त्या प्रवर्गातील लाभार्थ्यांसाठीच्या घरकुलांकरिता व सुविधांकरिता वापरली जाईल याची दक्षता संबंधीत अंमलबजावणी यंत्रणेने घ्यावी.

९. महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरणावर योजनेअंतर्गत होणाऱ्या खर्चाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित कालावधीत केंद्र व राज्य शासनास सादर करणे बंधनकारक राहील. जर वितरीत केलेली रक्कम ज्या प्रयोजनासाठी वितरीत केली आहे, त्या प्रयोजनासाठी वापरली नाही, तर सदर रक्कम प्राधिकरणाकडून व्याजासह वसूल करण्यात येईल.

१०. या अनुदानाविषयीचे लेखे जर केंद्र शासन/महालेखापाल यांनी मागविल्यास ते त्यांच्या माहितीकरिता/तपासणीकरिता सादर करण्याची प्राधिकरणावर जबाबदारी असेल. सदर लेखाशिर्षकाचे दर महिन्याअखेरचा ताळमेळ महालेखापाल कार्यालयातील लेख्याशी ठेऊन त्याबाबतचा अहवाल दर महिना अखेर शासनास सादर करण्यात यावा.

११. या शासन निर्णयाव्दारे वितरीत करण्यात येत असलेली रक्कम खालील प्रमाणे लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावी व त्या त्या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ करीता मंजूर तरतुदीतून हा खर्च भागविण्यात यावा.

अ) केंद्र हिश्श्यापोटी वितरीत रुपये १,४३,१४,०००/-(रुपये एक कोटी त्रेचाळीस लाख चौदा हजार फक्त) हा निधी मागणी क्रमांक क्यू-३ मुख्य लेखाशिर्ष २२१६-गृहनिर्माण-८०,सर्वसाधारण,१०३, गृहनिर्माण मंडळे महामंडळे इत्यादींना सहाय्य, (०५) सहायक योजना (जेएनएनयुआरएम) (केंद्र हिस्सा) , (०५) (०२) जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी नवीकरण अभियान- एकात्मिक गृहनिर्माण व झोपडपट्टी विकास कार्यक्रम (आय.एच.एस.डी.पी.) (सर्वसाधारण योजना) (केंद्र हिस्सा) (८० टक्के) ३१,सहायक अनुदान (२२१६ १४६१) या लेखाशीर्षाखाली मंजूर तरतुदीतून, भागविण्यात यावा.

१२. हा शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.५१७ /२०१४/व्यय-३ दि.१०.०९.२०१४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०१०८१४४२०३६४०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Pathade Kishor Govind

Digitally signed by Pathade Kishor Govind
DN: c=IN, o=Govt Of Maharashtra, ou=Housing Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pathade Kishor Govind
Date: 2015.01.08 14:50:50 +05'30'

**(कि गो.पठाडे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, (पत्राने)
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई-३२.
३) मा.मंत्री (गृहनिर्माण) यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई-३२.
४) मा.राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई-३२.
५) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,विधान भवन, मुंबई.
६) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,विधान भवन, मुंबई.
७) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२.
८) उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
९) मुख्य अभियंता-२ ,राज्यस्तरीय समन्वय अधिकारी, जेएनएनयुआरएम कक्ष, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
१०) प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र-१(लेखा व अनुज्ञेयता)/लेखापरीक्षा, मुंबई.
११) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता)/ लेखापरीक्षा,नागपूर.
१२) मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोंकण विभाग, नवी मुंबई.
१३) उपमुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा कोंकण विभाग, नवी मुंबई.
१४) संबंधित कोषागार अधिकारी, (शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्रानुसार)
१५) वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई.

१६) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.

१७) निवासी लेखा अधिकारी, मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.

१८)मुख्यअधिकारी,बाळापूर/दोंडाई/खामगाव/कागल/येवला/पवनी/कारंजा/शिरपूरवरवाडे/ लोणार गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ.

१९) प्रधान सचिव, वित्त विभाग तसेच वित्त विभागांतर्गत (व्यय-३, अर्थसंकल्प १७ व अर्थोपाय कार्यासन), मंत्रालय, मुंबई.

२०) प्रधान सचिव, नियोजन विभाग (का.१४६१), मंत्रालय, मुंबई-३२.

२१) प्रधान सचिव, सामाजिक न्याय व सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

२२) प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

२३) प्रधान सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

२४) प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

२५) उप संचालक (एम) भारत सरकार, शहर कार्या आणि रोजगार मंत्रालय, शहरी रोजगार व दारिद्रय निर्मुलन विभाग (संनियत्रण कक्ष) निर्माण भवन, नवी दिल्ली (नोंदणीकृत डाकेने)

२६) सह संचालक, लेखा व कोषागरे कॉम्प्युटर सेल, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला मंत्रालयासमोर, मुंबई.

२७) संबंधित मुख्याधिकारी, बाळापूर/दोंडाई/खामगाव/कागल/येवला/पवनी/कारंजा/शिरपूर-वरवाडे/लोणार नगरपरिषद (शासन निर्णयासोबतच्य विवरणपत्रानुसार)

२८) निवडनस्ती/गृनिधो-२ (सेल) कार्यासन, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

**शासन निर्णय क्र.जनेयो.२०१४/प्र.क्र.४२/भाग-१/गृनिधो-२ (सेल)/दि.०८जानेवारी २०१५ सोबतचे विवरणपत्र.**

(रुपये लाखात)

| क्र. | प्रकल्पाचे नांव | प्रकल्प किंमत | केंद्र शासनाव्दारे वितरीत २२१६१४६१ | हप्ता क्रमांक |
|---|---|---|---|---|
| १ | बाळापूर | ४०३८.१० | ३६.७१ | तपशिलवार प्रकल्प अहवाल (DPR) तयार करण्यासंबंधीच्या खर्चाची प्रतिपूर्ती एकवेळचे प्रदान |
| २ | दोंडाईचा फेज-१ | १६७६.७१४ | १५.९७ | |
| ३ | खामगाव फेज-१ | २७३७.७७ | २३.६४ | |
| | एकूण-१-३ | | ७६.३२ | |
| ४ | कागल | २१९०.८५ | ५.०० | |
| ५ | येवला | १३६.६९ | १.३६ | |
| ६ | पवनी | १४६.४० | १.४६ | |
| ७ | कारंजा | १८५६.९५ | १६.५३ | |
| ८ | शिरपूर -वरवडे | ४८५.९७ | ४.८६ | |
| ९ | लोणार-१ | १६२२.०८ | १६.२२ | |
| | एकूण-४-९ | | ४५.४३ | |
| १० | लोणार-२ | २१३९.११ | २१.३९ | |
| एकूण (१ ते१०) | | | १४३.१४ | |